**पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई**
प्री-व्हयू थिएटरसाठी डिजीटल सिनेमा प्रोजेक्टर (DCP) खरेदीस मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-पुलदे-२०१७/प्र.क्र.१५१/सां.का.२**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ०५ फेब्रुवारी, २०१९.**

**वाचा :-** १) प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र-पुलअ/ ४७०१, दि.२.१२.२०१७.
२) शासन निर्णय क्रमांक पुलदे-२०१७/प्र.क्र.१५१/सां.का-२, दिनांक ११.०७.२०१८.
३) प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र- आस्थापना/२०१९ पुलअ/९५२, दि.२५.०१.२०१९.

**प्रस्तावना :-**

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीच्या मिनी थिएटरसाठी डिजीटल सिनेमा प्रोजेक्टर (DCP) खरेदी करण्याचा प्रस्ताव संदर्भीय पत्रान्वये प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांनी शासनास सादर केला होता. या डिजीटल सिनेमा प्रोजेक्टरमुळे (DCP) मिनी थिएटरचे रूपांतर प्री-व्हयू थिएटरमध्ये होईल व त्यामुळे चित्रपटांचे Previews, प्रेस शो, सेन्सॉर इ.साठी याचा उपयोग होईल. तसेच यामुळे अकादमीच्या उत्पन्नात वाढ होईल. संदर्भाधिन दि. ११.७.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू. ३० लाख इतक्या खर्चास मान्यता देण्यात आलेली होती. या कामसाठीच्या निविदा मागविण्यात आल्यानंतर प्रत्यक्ष किंमत रू. ५० लाख पेक्षा जास्त रक्कमेच्या निविदा प्राप्त झाल्या. त्यापुढे आता प्रकल्प संचालक यांनी संदर्भाधिन दि. २५.१.२०१९ रोजीच्या पत्रान्वये खर्चाची सुधारीत किंमत कळविले आहे. या किंमतीनुसार सदर डिजीटल सिनेमा प्रोजेक्टर (DCP) खरेदीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीला डिजीटल सिनेमा प्रोजेक्टर (DCP) खरेदी करण्यास संदर्भाधिन शासन निर्णय दि. ११.७.२०१८ अन्वये रू. ३० लाख इतक्या रकमेस मान्यता देण्यात आलेली होती. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांच्या दि. २५.१.२०१९ रोजीच्या पत्रान्वये या कामासाठी द्यावयाच्या निविदाच्या प्राप्त किंमतीनुसार सुधारीत रकमेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यास या शासन निर्णयान्वये यासाठी रु. ५१,६७,५००/- (अक्षरी रुपये एकावन्न लाख सदुसष्ट हजार पाचशे फक्त) च्या मर्यादेत खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. डिजीटल सिनेमा प्रोजेक्टर (DCP) खरेदी करण्यासाठी ई-निविदा प्रक्रियेचा अवलंब करण्यात यावा. उद्योग, उर्जा व कामगार विभागाने शासकीय विभागाच्या करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीची विहीत कार्यपध्दती निश्चित केली असून त्याचे डिजीटल सिनेमा प्रोजेक्टर (DCP) खरेदी करताना पालन करण्यात यावे.

**०२.** डिजीटल सिनेमा प्रोजेक्टर (DCP) खरेदीसाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी- २, २२०५ कला व संस्कृती (०७), कला अकादमी (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी (२२०५ १४६३), १३- कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०२०५१५५५४५९७२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2019.02.06 12:25:35 +05'30'

**(बाळासाहेब सावंत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. उप सचिव (व्यय-१५), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव, (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती, सां.का.२.